**सन २०१५ व सन २०१६ या वर्षातील विविध कृषि पुरस्कार व पीक स्पर्धा विजेते शेतकऱ्यांचा सत्कार करण्याच्या योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- कृभूपु -२०१७/प्र.क्र.६२/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक :- १२ फेब्रुवारी, २०१९

<u>वाचा :-</u> १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. कृभूपु-२०१२/प्र.क्र.१३४/११-अे, दि.०६.९.२०१४
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. कृभूपु-२०१३/प्र.क्र.१७८/११-अे, दि.०६.९.२०१४
३) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ -३, दि.१८.०४.२०१७
४) शासन निर्णय कृषि व पदूम विभाग क्र. कृभूपु-२०१५/प्र.क्र.१२८/ ११- अे , दि.२९.०६.२०१७
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५.०१.२०१९

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यातील कृषि व पूरक क्षेत्रात उल्लेखनीय कार्य करणाऱ्या शेतकरी व संस्था यांना दरवर्षी विविध कृषि पुरस्कार देवून त्यांचा गौरव करण्यात येतो. सन २०१५ व सन २०१६ या वर्षीच्या कृषि पुरस्काराच्या वितरणाचा कार्यक्रम दि.१४.०२.२०१९ रोजी पुणे येथे आयोजित करावयाचा आहे. सदर कार्यक्रमासाठी सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित करण्यात आलेली रु.७०.०० लाख ही रक्कम तसेच हिवाळी अधिवेशन सन २०१८ मध्ये पुरवणी मागणीव्दारे अर्थसंकल्पित करण्यात आलेली रु.१.०० कोटी अशा एकुण रु.१.७० कोटी इतक्या रकमेच्या ८० टक्केच्या मर्यादेत म्हणजेच **रु.१.३६ कोटी** इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

सन २०१५ व सन २०१६ या वर्षांतील विविध कृषि पुरस्कार वितरीत करण्यासाठी दि.१४.०२.२०१९ रोजी पुणे येथे कार्यक्रम आयोजित करण्यात आला असून, सदर कार्यक्रमाचा खर्च भागविण्यासाठी रु.१.३६ कोटी इतकी रक्कम वितरीत करण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा :-

**मागणी क्र. डी-३**
**२४०१- पिक संवर्धन**
**१०९ - विस्तार व शेतकरी प्रशिक्षण**
**०१ - माहिती व प्रसार**
**(०१) (०३) पीक स्पर्धा, (२४०१ ०७५३) योजनांतर्गत**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१) यांना आहरण व संवितरण अधिकारी व कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/ प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८ अन्वये तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रं.५३/२०१८, व्यय-१, दि.१२.०२.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९०२१२१७२९११२००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2019.02.13 12:26:04 +05'30'

**(डॉ.किरण पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१) सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) विभागीय कृषि सह संचालक, पुणे विभाग, पुणे
५) विभागीय कृषि सह संचालक, ठाणे विभाग, ठाणे
६) महालेखापाल-महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) उप सचिव (का.११-अे, का.१७-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) सह सचिव (फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पुणे/अहमदनगर/सोलापूर/ठाणे
११) कक्ष अधिकारी (का.२-अे,का.१७-अे, का.१४-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प-१३/ विनियम), मंत्रालय, मुंबई-३२
१३) निवड नस्ती (कार्यासन ११-अे).